जळगांव जिल्ह्यातील जळगांव तालुक्यातील ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.३२/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०२ सप्टेंबर, २०२०.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा.क्र./साबांप्राविना/प्रआ/दर्जोन्नत/जळगांव/३९१३/२०१९, दि.२५/०७/२०१९.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये जळगांव जिल्ह्यातील जळगांव तालुक्यातील ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, जळगांव यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, जळगांव यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, जळगांव यांचा ठराव विचारात घेऊन जळगांव जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | सुरदे ते सुरदे फाटा आव्हाणे फाटा रस्ता. | ग्रामीण मार्ग मार्ग ४६ | (०/००ते ३/५००) ३.५०० कि.मी. | २०.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१२५ |
| | | ग्रामीण मार्ग मार्ग ८८ | (३/००ते ११/५००) ८.०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग मार्ग ५६ | (१४/५००ते २३/५००) ९.०० कि.मी. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | जळगांव मेहरूण पाझरपोळ कुसुंबा चिंचोली धानवड करमाळ रस्ता. | ग्रामीण मार्ग मार्ग ६५ | (०/०० ते ४/००) ४.०० कि.मी. | १४.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१२६ |
| | | ग्रामीण मार्ग ६४ | (४/०० ते ६/००) २.०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग मार्ग ११२ | (०/०० ते ४/००) ४.०० कि.मी. | | |
| | | रा.म.मा.क्र. ४२ | ३.००कि.मी. (ओव्हरलॅप लांबी) | | |
| | | ग्रामीण मार्ग मार्ग ६२ | (१३/०० ते १७/००) ४.०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **३४.५०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील जळगांव जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **३४.५०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (३४९५.२५+ ३४.५००) म्हणजेच **३५२९.७५ कि.मी.** इतकी व ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **३४.५०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (६१८०.९००-३४.५००) म्हणजेच **६१४६.४०० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००९०२१५३८४८८२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.09.02 15:39:24 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी, जळगांव.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, जळगांव. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जळगांव.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.